विशेष प्रसिध्दी मोहिम सन २०१८-१९ अंतर्गत प्रसिध्दी व इतर अनुषंगिक बाबींसाठी होणाऱ्या खर्चास प्रशासकीय व वित्तीय मान्यता देण्याबाबत..

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः मावज-२०१८/प्र.क्र.२४०/का.३४**
**मादाम कामा रोड,हुतात्मा राजगुरु चौक,**
**मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.**
**दिनांक: ६ जूलै, २०१८**

**वाचा :-** माहिती व जनसंपर्क महासंचालनालयाचे पत्र क्र.वृत्तचित्र-२०१८/संवाद वारी-प्रस्ताव/का-७/१०९, दि.२/६/२०१८.

**प्रस्तावना:-**

सर्वसामान्य जनतेला शासनाच्या विविध योजना व महत्त्वाकांक्षी प्रकल्प यांची माहिती होण्यासाठी माहिती व जनसंपर्क महासंचालनालयामार्फत विविध योजनांची प्रसिध्दी करण्यात येते त्यानुसार सन २०१८-१९ या आर्थिक वर्षामध्ये शासकीय योजनांची विशेष प्रसिध्दी मोहीम राबविण्यास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

शासकीय योजनांची विशेष प्रसिध्दी मोहीम सन २०१८-१९ (योजनांतर्गत) योजने अंतर्गत आषाढी वारीनिमित्त महाराष्ट्र शासनाच्या विविध कल्याणकारी योजना व विकास कामाची माहिती सामान्य जनतेपर्यंत पोहचविण्यासाठी आषाढी वारी कालावधीत दिंडी प्रवास मार्गावर विविध उपक्रमांद्वारे (शासकीय संदेशाचे प्रसारण, पंढरपूर येथे भव्य प्रदर्शन, होर्डिंग इत्यादी) शासनाच्या विविध योजनांची माहिती योग्य आणि पात्र लाभार्थ्यांपर्यंत तसेच नागरिकांपर्यंत पोहचविणे यासाठी येणाऱ्या बाबी करिता सन २०१८-१९ या वर्षासाठी रु. **रु.३,१८,८८,६००/- (रुपये तीन कोटी अठरा लाख अठठयांशी हजार सहाशे फक्त)** इतक्या रकमेच्या खालील बाबीवरील खर्चास या शासन निर्णयान्वये प्रशासकीय व वित्तीय मान्यता देण्यात येत आहे.

| अ. क्र. | बाब | खर्चाचा तपशिल | अंदाजित खर्च (रुपये) |
|---|---|---|---|
| १. | चित्ररथ (२ नग) | दोन्ही पालखी मार्गाकरिता चित्ररथाची निर्मिती फेब्रिकेशन, डिझाइन, सजावट लेआउट, ध्वनी यंत्रणा, ध्वनीमुद्रण, संगीत, निवेदन, वाहनचालक, क्लिनर, सहायक, सुरक्षा रक्षक, आकस्मिक व अनुषंगिक खर्च. | **४४,२०,०००/-** |
| २. | प्रदर्शन | वारीच्या दोन्ही मार्गांवर प्रदर्शनाचे आयोजन पॅनल, डिझाइन, व्हिजुअल, कॉपीराइट, ग्राफिक्स, छायाचित्र संकलन आणि संपादन, प्रतिकृती, Interactive Tablet, व्हिडिओ इंटरॲक्टिव्ह वॉल, समन्वयक, सहायक, मदतनीस, फोल्डेबल टेन्ट, टेबल, खुर्च्या, पंखे, कारपेट, मनुष्यबळ, जनरेटर वाहतुक, प्रदर्शनाच्या साहित्याची वाहतूक, सजावटीच्या वस्तु, साऊंड सिस्टिम, इतर आकस्मिक व अनुषंगिक खर्च. | **४५,२४,०००/-** |

| | | | |
|---|---|---|---|
| ३. | कलापथक | वारीच्या दोन्ही मार्गावर कलापथक, कलाकार, (वादक व वाद्यासह), ध्वनी व प्रकाश यंत्रणा, संहिता, दिग्दर्शन, तालीम, फॅब्रिकेटेड, सुशोभित रंगमंच, व इतर व्यवस्थेसह एक मोबाईल व्हॅन. | **१५,७५,०००/-** |
| ४. | पथनाट्य | पथनाट्ये दोन समूह, ध्वनी व प्रकाश यंत्रणा, संहिता, दिग्दर्शन, तालीम, कलाकारांची ने-आण. | **११,१९,०००/-** |
| ५. | एलईडी वॉल सह मोबाइल व्हॅन | दोन्ही पालखी मार्गावरील प्रमुख गावात एलईडी वॉलसह मोबाईल व्हॅन. | **८,००,०००/-** |
| ६. | पंढरपूर येथे ७ दिवसां-करिता भव्य प्रदर्शन | पंढरपूर येथे भव्य प्रदर्शनाचे आयोजन जागेचे भाडे, टेन्टचे भाडे, कारपेट, टेबल, खुर्च्या, पंखे (लेबर सह) प्रदर्शन समन्वयक, सजावटीच्या वस्तु, साऊंड सिस्टिम व प्रकाश यंत्रणा, इतर आकस्मिक व अनुषंगिक खर्च | **६,०७,०००/-** |
| ७. | रेडिओ केंद्रावरुन शासकीय संदेशाचे प्रसारण | वारी मार्गावरील एफएम व स्थानिक रेडीओ केंद्रावरुन स्पॉट जिंगल्स प्रसारित करणे | **१२,००,०००/-** |
| ८. | एसटी बस स्टॅण्डवर शासकीय संदेशाचे प्रसारण | वारी मार्गावरील बस स्टॅण्डवरुन ऑडिओ जिंगल्स स्पॉट प्रसारण | **१,५३,६००/-** |
| ९. | होर्डिंग्ज | वारी मार्गावरील एसटी स्टँडवर होर्डिंग्ज लावणे | **३०,०००/-** |
| १०. | घडीपत्रिका | शासकीय योजनांची माहिती देणाऱ्या घडीपत्रिकेची छपाई | **२५,००,०००/-** |
| ११. | सर्वेक्षण | १) शासकीय योजनांबाबत जनतेला मिळालेल्या माहिती संदर्भात जनमताचा कानोसा घेण्याकरिता सर्वेक्षण करण्यास येणारा खर्च<br>प्रश्नावली तयार करणे, प्रश्नावलीच्या प्रती तयार करणे, सर्वेक्षण करणे, डेटा ऑपरेटर्स (२) आकस्मिक व अनुषंगिक खर्च | **७८,१०,०००/-** |
| १२. | सोशल मीडिया | सोशल मीडियावरुन मोहिमेची माहिती देणे | **५,००,०००/-** |
| १३. | क्रिएटिव्ह | १० ऑडिओ जिंगल्सची निर्मिती, १० ऑडिओ स्पॉट निर्मिती, प्रिंट क्रिएटिव्ह होर्डिंग्ज, घडीपत्रिका आदीकरिता (अॅडेपटेशनसह), २ चित्रफितीची निर्मिती | **६२,५०,०००/-** |

| | | | |
|---|---|---|---|
| १४. | मोहिमेत सहभागी कलाकार, अधिकारी, कर्मचारी, सादरकर्ते आदींसाठी पिण्याचे पाणी, मोबाईल टॉयलेट व इतर अनुषंगिक सोयी सुविधा | | **४,००,०००/-** |
| | | **संवाद वारीकरिता येणारा एकूण अंदाजित खर्च** | **३,१८,८८,६००/-** |

२. वरील प्रयोजनासाठी येणारा खर्च "सामान्य प्रशासन विभाग, मागणी क्र.ए-६, २२२०-माहिती व प्रसिध्दी ६० इतर, १०१ जाहिरात व दृक प्रसिध्दी, (००)(०३) शासकीय योजनांची विशेष प्रसिध्दी मोहिम, २६-जाहिरात व प्रसिध्दी (संगणक सांकेतांक २२२० ११७५) (योजनांतर्गत)" या लेखाशिर्षाखाली सन २०१८-१९ या आर्थिक वर्षातील मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा. सदर खर्च करतांना शासनाचे प्रचलित नियम/आदेश, कार्यपध्दती इ. चा अवलंब करण्यात यावा.

३. हा शासन निर्णय नियोजन विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.११३/१८/१४४३, दि.२८/६/२०१८ अन्वये प्राप्त सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१८०७०६१६५३३६०७०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.**

Satish Shankar Gurav

Digitally signed by Satish Shankar Gurav
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=GAD Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=7675fe7e094c776254627b6532952d0f7e8b83a43b7de2c0bbee54fdcd7a0790, cn=Satish Shankar Gurav
Date: 2018.07.06 17:01:16 +05'30'

**(स. शं. गुरव)**
**कार्यासन अधिकारी**

**प्रति,**

संचालक (माहिती)(प्रशासन), माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई

**प्रत,**

१. मा.विरोधी पक्षनेता, दोन्ही सभागृह, महाराष्ट्र विधानमंडळ, मुंबई

२. सर्व विधानसभा सदस्य/विधान परिषद सदस्य
३. महालेखापाल, महाराष्ट्र १/२ (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई/नागपूर
४. महालेखापाल१/२ (लेखा परीक्षा), मुंबई/नागपूर
५. अधिदान व लेखाधिकारी, मुंबई
६. निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई
७. महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई-३२
८. संचालक(माहिती) (प्रशासन) माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई
९. मुख्यमंत्र्यांचे जनसंपर्क अधिकारी, मुख्यमंत्री सचिवालय, मुंबई
१०.मा.राज्यमंत्री(मा.व ज.), यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
११.उप संचालक(लेखा), माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई
१२. लेखाधिकारी (आहरण व संवितरण) माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई
१३. नियोजन विभाग /का-१४४३, मंत्रालय, मुंबई
१४. निवड धारिका/ कार्यासन ३४